**<u>अर्थसंकल्पीय अनुदान. वर्ष २०१०-२०११.</u>**
**महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी (विशेष घटक योजना) अनुदान देणे.**
**मागणी क्रमांक वाय-२, २२१५, (२२१५ २०६२) (वेतनेतर)**

-------------------------------------

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक नादव-२०१०/पापुयो/अनुदान/प्र.क्र.७७/पापु-२४**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : २७ सप्टेंबर, २०१०**

**<u>प्रस्तावना -</u>**

सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षासाठी विधीमंडळाने मंजूर केलेल्या अनुदानाच्या तरतूदींच्या अनुषंगाने नागरी पाणी पुरवठा कार्यक्रम, या योजनांतर्गत कार्यक्रमाखालील नागरी नळ पाणी पुरवठा योजनेतील, मागणी क्रमांक वाय-२, २२१५ महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान (विशेष घटक योजना), (२२१५२०६२) (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली रुपये १०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे.

२. शासन निर्णय क्रमांक नादपि-२००४/प्र.क्र.२८/पापु-२२ दिनांक २५ ऑगस्ट,२००६ अन्वये, नागरी भागातील दलित वस्त्यांकरीता पिण्याच्या पाण्याची व्यवस्था करण्यासाठी नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना नियमित राबविण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्यात आला आहे. या शासन निर्णयान्वये, नागरी पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत नागरी वस्ती दलित पाणी पुरवठा योजनेच्या धोरणात्मक बाबी, योजनेचे सुधारीत व सर्वंकष निकष तसेच योजनेची कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे.

३. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांतर्गत घ्यावयाच्या कामांकरीता नागरी स्वराज्य संस्थांना ९० टक्के अनुदान आणि १० टक्के लोकवर्गणी असा वित्तीय आकृतीबंध विहीत करण्यात आला आहे. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांतर्गत अनुदानाची रक्कम विशेष घटक योजने अंतर्गत आहे.

**(कृपया मागे पहावे)**

४. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना अंतर्गत हाती घ्यावयाच्या कामांसाठी नागरी स्वराज्य संस्थांच्या वर्गवारीनुसार पुढीलप्रमाणे कमाल शासकीय अनुदान अनुज्ञेय राहील.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्था | कमाल अनुज्ञेय अनुदान |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | महानगरपालिका | ३२.०० |
| २. | अ वर्ग नगरपरिषद | १५.०० |
| ३. | ब वर्ग नगरपरिषद | १२.०० |
| ४. | क वर्ग नगरपरिषद | १०.०० |

५. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षात शासन निर्णय क्रमांक नादव-२०१०/पापुयो/प्रशासकीय मान्यता/ प्र.क्र.१००/पापु-२४, दिनांक २४ सप्टेंबर, २०१० अन्वये नागरी स्वराज्य संस्थांच्या नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांना प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे.

६. सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदी (विशेष घटक योजना) (योजनांतर्गत) देय अनुदान मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. करीता माहे सप्टेंबर, २०१० या महिन्यात संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान मंजूर व मुक्त करण्याचा पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

**राज्यातील नागरी क्षेत्रातील महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान (विशेष घटक योजना) या कार्यक्रमाखालील पाणी पुरवठा योजनांचे कार्यान्वयन नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून करण्यात येते.**

२. नागरी पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत, नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना, या योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याकरिता जिल्हाधिकारी यांच्याकडे नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनेच्या जिल्हा स्तरावरील संनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यात आली आहे. जिल्हाधिकारी यांना या कार्यक्रमाच्या अनुषंगाने आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. हया कार्यक्रमाकरिता शासनाकडून जिल्हाधिकारी यांच्यामार्फत संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**३. सदर लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या रुपये १०,००,००,०००/- (रुपये दहा कोटी फक्त) इतक्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैंकी, या शासन निर्णयान्वये रुपये ०२,५८,२९,४४६/- (रुपये दोन कोटी अठ्ठावन्न लाख एकोणतीस हजार चारशे सेहेचाळीस फक्त) एवढे अनुदान, जिल्हाधिकारी जळगांव, अहमदनगर, भंडारा, गडचिरोली, अमरावती व लातूर यांना पुढील अटींच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे. वितरीत करण्यात येणारे अनुदान सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ ०५ मध्ये दर्शविण्यात आले आहे. या मंजूर व मुक्त अनुदानाचे जिल्हानिहाय वाटप विवरणपत्र 'अ' मध्ये आणि महानगरपालिका व वर्गवारीप्रमाणे नगरपालिकानिहाय वाटप विवरणपत्र ब मध्ये दर्शविण्यात आले आहे.**

(३.१) जिल्हाधिकारी जळगांव, अहमदनगर, भंडारा, गडचिरोली, अमरावती व लातूर यांनी सदर मुक्त अनुदान, यासोबत जोडलेल्या विवरणपत्र-ब मध्ये नमूद केलेल्या नागरी स्वराज्य संस्थांना पुनर्वाटपाव्दारे वाटप करण्यात यावे.

(३.२) हया योजनेअंतर्गत मंजूर व मुक्त अनुदानाच्या रकमेचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत.

(३.३) संबंधीत जिल्हाधिकारी यांनी सदरचे शासनामार्फत मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानाचे जिल्हाधिकारी यांनी, त्यांच्या जिल्हयातील संबंधित महानगरपालिका आणि अ,ब व क नगरपालिका यांना पुनर्वाटप करुन शासनास त्वरित कळवावे.

(३.४) संबंधित महानगरपालिका आणि नगरपालिका यांनी उपरोक्त मंजूर व मुक्त रक्कम ज्याकरीता मंजूर व मुक्त करण्यात आलेली आहे त्या विनिर्दिष्ट प्रयोजनाकरीताच दिनांक ३१ मार्च, २०११ पर्यंत खर्च करावी.

(३.५) जिल्हाधिकारी यांनी या योजनेंतर्गत आपल्या जिल्हयातील संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत निधीचा वर्षनिहाय तपशील,प्राप्त निधीतून हाती घेतलेली कामे,त्यापैकी पूर्ण कामे,अपूर्ण कामे, खर्च झालेली रक्कम व अखर्चित रक्कम इ. बाबतचा अभिलेख ठेवावा व ही माहिती शासनास आवश्यकतेनुसार तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

(३.६) हया योजनेअंतर्गत मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानातून संबंधित महानगरपालिका आणि नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी, हया योजनांकरिता केलेल्या खर्चाचे लेखे तपासणीचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई /नागपूर यांना किंवा खास अधिकार दिलेला या विभागातील अधिकारी यांना देण्यात येत आहेत. याबाबत संबंधित कागदपत्रे महालेखापाल किंवा खास अधिकार दिलेला विभागातील अधिकारी यांनी मागणी केल्यास संबंधित महानगरपालिका व नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी, त्यांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावीत.

(३.७) मुंबई वित्तिय नियम १९५९ मधील जोडपत्र २ मधील नियम क्रमांक ३ अनुसार महालेखापालांच्या मागणीनुसार संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे लेखे संबंधित कागदपत्रांसह निरीक्षणाकरिता संबंधित महानगरपालिका आणि अ,ब व क नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी महालेखापाल यांना सादर करावेत.

(३.८) हया योजनेअंतर्गत शासनाकडून जी अनुदाने प्राप्त झालेली आहेत, त्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र **(COMPLETION CERTIFICATE),** संबंधित महानगरपालिका व मुख्य अधिकारी अ,ब व क नगरपालिका आणि जिल्हाधिकारी यांनी शासनास द्यावयाची आहेत. आयुक्त महानगरपालिका आणि मुख्य अधिकारी नगरपालिका यांनी उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र **(COMPLETION CERTIFICATE),** यांमध्ये दर्शविलेल्या मंजूर व मुक्त अनुदानाच्या व खर्चाच्या कार्यक्रमनिहाय रकमा प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात. उपयोगिता प्रमाणपत्र आणि काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र **(COMPLETION CERTIFICATE),** यांवर जिल्हाधिकारी यांनी प्रतिस्वाक्षरी करावी. अशी प्रमाणपत्रे शासनास स्विकाराई होतील. त्याचप्रमाणे काम पूर्ण केल्याचे प्रमाणपत्र (**COMPLETION CERTIFICATE**) महालेखापाल यांनाही पाठवावे.

(३.९) हया योजनेतर्गत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मंजूर व मुक्त करण्यात आलेल्या अनुदानाचा विनियोग संबंधीत आर्थिक वर्षातच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन योजनेच्या मार्गदर्शक तत्वानुसारच होईल, याबाबतची खबरदारी जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

(कृपया मागे पहावे.)

(३.१०) हया योजनेअंतर्गत हाती घेतलेल्या कामाची भविष्यकाळातील देखभाल व दुरुस्तीवरील १०० टक्के खर्च संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या स्वनिधीतून करावयाचा आहे. हया योजनेच्या देखभाल व दुरुस्तीकरिता शासनाकडून कोणत्याही स्वरुपात अनुदान उपलब्ध करण्यात येणार नाही.

(३.११) मंजूर व मुक्त अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व विहित अहवाल विहित दिनांकास शासनास सादर करावा.

४. नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांबाबत क्रमांक नादपि-२००४/प्र.क्र.२८/पापु-२२ दिनांक २५ ऑगस्ट,२००६ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही पूर्ण करण्यात यावी.

५. उपरोक्त मंजूर व मुक्त करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ - पाणी पुरवठा, १९१ - स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य- राज्य योजना- (०२) (१०) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान (विशेष घटक योजना) (२२१५ २० ६२) ३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर), या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतूदीतून भागवावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००९२७१४२१५४०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी. जी. ओ. इमारत, न्यू मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई - ४०००२०.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हिल लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर - ४४०००१.
३) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक / नागपूर विभाग, नागपूर / औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
४) जिल्हाधिकारी, जळगांव, अहमदनगर, भंडारा, गडचिरोली, अमरावती व लातूर
५) आयुक्त, जळगांव महानगरपालिका / अहमदनगर महानगरपालिका, अहमदनगर / अमरावती महानगरपालिका, अमरावती.
६) संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, शासकीय परिवहन सेवा इमारत,सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई-४०० ०२५.
७) संचालक, समाजकल्याण, ३, चर्च रोड, सेंट्रल बिल्डिंग, पूणे- ४११००१.

८) सह संचालक, समाजकल्याण, ३, चर्च रोड, सेंट्रल बिल्डिंग, पूणे- ४११००१.

९) सह संचालक, अनुसूचित जाती उपयोजना (सांख्यिकी),समाजकल्याण, ३, चर्च रोड, सेंट्रल बिल्डिंग, पूणे- ४११००१.

१०) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, भूजल भवन,कृषी विद्यापीठ परिसर,शिवाजी नगर, पूणे-४११००५.

११) उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, नाशिक विभाग, नाशिक/ मराठवाडा विभाग,औरंगाबाद/ नागपूर विभाग, नागपूर.

१२) वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, जळगांव, अहमदनगर, भंडारा, गडचिरोली, अमरावती व लातूर.

१३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्स्प्रेस टॉवर्स, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.

१४) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई - ४००६१४.

१५) प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक विभाग, नाशिक / मराठवाडा विभाग,औरंगाबाद/ नागपूर विभाग, नागपूर.

१६) अधीक्षक अभियंता (मध्यवर्ती नियोजन, संकल्पचित्र व संनियंत्रण कक्ष), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवीन प्रशासकीय इमारत, दुसरा मजला,एस.टी.पी. कंपाऊंड, कन्हैया नगर जवळ, कोपरी कॉलनी, ठाणे (पूर्व), जिल्हा - ठाणे. पीनकोड-४००६०३.

१७) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, जळगांव, अहमदनगर, भंडारा, गडचिरोली, अमरावती व लातूर.

१८) अधिदान व लेखा अधिकारी, शासकीय कुटीर, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०००२१.

१९) निवासी लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय इमारत, सातवा मजला, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व) मुंबई -४०००५१.

२०) जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव, अहमदनगर, भंडारा, गडचिरोली, अमरावती व लातूर.

२१) जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपालिका प्रशासन, जिल्हाधिकारी कार्यालय, जळगांव, अहमदनगर, भंडारा, गडचिरोली, अमरावती व लातूर.

२२) मुख्य अधिकारी, नगर परिषद, भुसावळ / चोपडा / चाळीसगांव / जामनेर / धरणगांव, जिल्हा जळगांव.

२३) मुख्य अधिकारी, नगर परिषद, तुमसर, जिल्हा सिंधुदूर्ग.

२४) मुख्य अधिकारी, नगर परिषद, गडचिरोली / देसाईगंज, जिल्हा गडचिरोली.

२५) मुख्य अधिकारी, नगर परिषद अचलपूर / मोर्शी, जिल्हा अमरावती.

२६) मुख्य अधिकारी, नगर परिषद, लातूर / उद्‌गीर / निलंगा / अहमदपूर / औंसा, जिल्हा लातूर.

२७) कार्यासन क्रमांक विघयो-१, सामाजिक न्याय विभाग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

२८) कार्यासन क्रमांक १४७३, १४५१ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

२९) कार्यासन क्रमांक व्यय- ३, बीयुडी- १८, अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०००३२.

३०) कार्यासन क्रमांक पापु- ०४,२०,२२ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई -४०००३२.

३१) मा.आमदार व खासदार (सर्व)

३२) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई ४०० ०३२. (१० प्रतींसह)

३३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. (५ प्रतींसह)

३४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, संगणक शाखा, मंत्रालय, मुंबई -४०००३२.

३५) निवडनस्ती (पापु-२४)

*********____________________*************

शासन निर्णय क्रमांक नादव-२०१०/पापुयो/अनुदान/प्र.क्र.७७/पापु-२४ दिनांक २७ सप्टेंबर, २०१० सोबतचे विवरणपत्र.

**विवरणपत्र.**

(रुपये)

| अ. क्र. | लेखाशीर्ष | वर्ष २०१०-२०११ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूद. | आतापर्यंत मुक्त केलेले अनुदान | या शासन निर्णयाव्दारे मुक्त केलेले अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | **मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ - पाणी पुरवठा, १९१ - स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य- राज्य योजना- (०२) (१०) महानगरपालिका व नगरपालिका यांच्या (स्थानिक संस्था) नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनांसाठी सहाय्यक अनुदान (विशेष घटक योजना) (२२१५ २० ६२)**<br>**३१, सहाय्यक अनुदान, (वेतनेतर)** | १०,००,००,००० | निरंक | **०२,५८,२९,४४६** |
| | **एकूण** | **१०,००,००,०००** | **निरंक** | **०२,५८,२९,४४६** |

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

------------------------------------ *****--------------------------------------------

**(कृपया पुढील पृष्ठावर पहावे.)**

शासन निर्णय क्रमांक नादव-२०१०/पापुयो/अनुदान/प्र.क्र.७७/पापु-२४
दिनांक २७ सप्टेंबर, २०१० सोबतचे सहपत्र.

**नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनें अंतर्गत जिल्हाधिकारी यांना मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानाचे जिल्हानिहाय विवरण.**

**विवरणपत्र अ.**

(रुपये)

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | महानगर पालिका | नगर पालिका | एकूण महानगर पालिका व नगर पालिका (०३ + ०४) | मंजूर व मुक्त अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | | | | | |
| १ | जळगांव | ०१ | ०५ | ०६ | ८६,१९,००० |
| २ | अहमदनगर | ०१ | निरंक | ०१ | २६,५९,४४६ |
| ३ | भंडारा | निरंक | ०१ | ०१ | १२,००,००० |
| ४ | गडचिरोली | निरंक | ०२ | ०२ | २२,००,००० |
| ५ | अमरावती | ०१ | ०२ | ०३ | ५७,००००० |
| ६ | लातूर | निरंक | ०५ | ०५ | ५४,५१,००० |
| | | | | | |
| | एकूण<br>०३ म.न.पा. व १५ न.पा. = १८ | ०३ | १५ | १८ | ०२,५८,२९,४४६ |

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

(कृपया पुढील पृष्ठावर पहावे.)

**शासन निर्णय क्रमांक नादव-२०१०/पापुयो/अनुदान/प्र.क्र.७७/पापु-२४,**
**दिनांक २७ सप्टेंबर, २०१० रोजीचे सहपत्र**

**नागरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजनें अंतर्गत जिल्हाधिकारी/महानगरपालिका/नगरपालिका यांना मंजूर व मुक्त केलेल्या अनुदानाचे जिल्हानिहाय/महानगरपालिकानिहाय/नगरपालिकानिहाय विवरण.**

<u>विवरणपत्र</u>

(रुपये)

| अ. क्र. | जिल्हयाचे नाव | नागरी स्थानिक संस्थेचे नांव | महानगरपालिका | नगरपालिका | वर्ग | मंजूर व मुक्त अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | **जळगांव** | जळगांव | महानगरपालिका | - | - | ३२,००,००० |
| | | भुसावळ | - | नगरपालिका | अ | १५,००,००० |
| | | चोपडा | - | नगरपालिका | ब | ११,३४,००० |
| | | चाळीसगांव | - | नगरपालिका | ब | ११,०८,००० |
| | | जामनेर | - | नगरपालिका | क | १०,००,००० |
| | | धरणगांव | - | नगरपालिका | क | ०६,७७,००० |
| | **एकूण : ०१ म.न.पा. व ०५ न.पा. = ०६** | | | | | **८६,१९,०००** |
| | | | | | | |
| २ | अहमदनगर | अहमदनगर | महानगरपालिका | - | - | २६,५९,४४६ |
| | **एकूण : ०१ म.न.पा** | | | | | **२६,५९,४४६** |
| | | | | | | |
| ३ | भंडारा | तुमसर | - | नगरपालिका | ब | १२,००,००० |
| | **एकूण : ०१ न.पा.** | | | | | **१२,००,०००** |
| | | | | | | |
| ४ | गडचिरोली | गडचिरोली | - | नगरपालिका | ब | १२,००,००० |
| | | देसाईगंज | - | नगरपालिका | क | १०,००,००० |
| | **एकूण : ०२ न.पा.** | | | | | **२२,००,०००** |
| | | | | | | |
| ५ | अमरावती | अमरावती | महानगरपालिका | - | - | ३२,००,००० |
| | | अचलपूर | - | नगरपालिका | अ | १५,००,००० |
| | | मोर्शी | - | नगरपालिका | ब | १०,००,००० |
| | **एकूण : ०१ म.न.पा. व ०२ न.पा. = ०३** | | | | | **५७,००,०००** |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६ | लातूर | लातूर | - | नगरपालिका | अ | १५,००,००० |
| | | उद्‌गीर | - | नगरपालिका | ब | १२,००,००० |
| | | निलंगा | - | नगरपालिका | क | १०,००,००० |
| | | अहमदपूर | - | नगरपालिका | क | ०९,००,००० |
| | | औंसा | - | नगरपालिका | क | ०८,५१,००० |
| | **एकूण : ०५ न.पा.** | | | | | **५४,५१,०००** |
| | | | | | | |
| | **एकूण : ०३ म.न.पा. व १५ न.पा. = १८** | | | | | **०२,५८,२९,४४६** |

(वि.गो.औगड)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

---------------------------*************------------------------------------------------------------
----------------------------------------------------------------------------------------------------